# महाराष्ट्र शासन

अविवि-२०१९/प्रक्र.४३/का.०७,
**अल्पसंख्याक विकास विभाग,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२,
दि. १०/०१/२०२०.

**विषय:- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत, यवतमाळ जिल्हयातील नगर परिषद, पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**संदर्भ :-**

१. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र. /क.लि/अल्पसं/PMJVK-प्रस्ताव/कावि/५०९/२०१९, दिंनाक. १३/०८/२०१९.

२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/६१/२०१९-MsDP-MOMA, दि २६/०९/२०१९

**ज्ञापन :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत-PMJVK (पूर्वीचा बहूक्षेत्रीय विकास कार्यक्रम MsDP) गठित शक्तिप्रदान समितीने दि.१३/०९/२०१९ रोजी झालेल्या १८ व्या बैठकीत यवतमाळ जिल्हयातील नगर परिषद, पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या रु. १०६.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भाधिन क्र. (२) अन्वये कळविण्यात आले आहे. प्रस्तूत प्रकरणी अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या निधी वितरणात केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० असून यामध्ये केंद्र शासनाचा एकूण हिस्सा रु.६३.६० लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा ४२.४० लाख इतका आहे.

२. केंद्र शासनाने प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत यवतमाळ जिल्हयातील नगर परिषद, पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामास दिलेल्या मान्यतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**(रु. लाखात)**

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | युनिटची संख्या | हिश्श्याचे प्रमाण | प्रती युनिट खर्च | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | अभ्यासिका केंद्र बांधकाम हजरत उमर फारूख हायस्कूल जवळ, वार्ड क्र.९ , नगरपरिषद, पुसद | ०१ | ६०:४० | १०६.०० | ६३.६० | ४२.४० | १०६.०० |

३. प्रस्तूत प्रकरणी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस नगर परिषद, पुसद, जि. यवतमाळ येथे अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

४. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत नगर परिषद, पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी संदर्भ क्र. (२) अन्वये रू ११८.०० लाख इतक्या किंमतीचा प्रस्ताव सादर केला आहे. तथापि केंद्र शासनाने प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत नगर परिषद, पुसद येथे रु. १०६.०० लाख इतक्या किंमतीचे अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार नगर परिषद, पुसद, जि. यवतमाळ येथे अभ्यासिका केंद्र बांधकाम करण्यासाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.१०६.००/- लाख (रुपये एकशे सहा लाख फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

| Summary Sheet | | |
|---|---|---|
| A | Total cost of Building | 92,91,665.00 |
| B | Add 12% GST | 11,15,000.00 |
| C | Add 3% Contingencies Charges | 1,93,335.00 |
| | **Total** | **1,06,00,000.00** |
| | **Say Rs** | **1,06,00,000.00** |

**अटी व शर्ती :-**

१. अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी प्राप्त करुन घ्यावी.

२. अभ्यासिका केंद्र बांधकाम हे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने सविस्तर अंदाजपत्रकास दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार नगर परिषद, पुसद यांच्या मार्फत करण्यात यावे.

३. मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद यांनी अभ्यासिका केंद्र बांधकाम करण्यासाठी आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी आणि यासाठी शासन निकषानुसार निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरुवात करावी व तसे शासनास अवगत करावे.

४. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (PMJVK) अंतर्गत मान्यताप्राप्त नगर परिषद, पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकाम हे नगर परिषद, पुसद यांच्या टाईप प्लॅननुसार करण्यात यावे.

५. अभ्यासिका केंद्राचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

६. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी केंद्र: राज्य हिस्सा अनुक्रमे ६०:४० असा आहे. मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद यांनी अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी प्राप्त होणा-या केंद्र व राज्य हिश्यातील रकमेच्या विनियोगाबाबतची स्वतंत्र उपयोगिता प्रमाणपत्रे त्रैमासिक प्रगती अहवाल (QPR) विहीत नमुन्यात (अद्यावत छायाचित्रांसह) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. अभ्यासिका केंद्र बांधकामाची माहीती विभागाच्या Construction Tracker प्रणालीवर वेळोवेळी Upload करावी.

७. मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद यांनी अभ्यासिका केंद्र बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य इमारत बांधकामाव्यतिरिक्त "इतर अनुषंगीक बाबीच्या" अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.

९. अभ्यासिका केंद्र बांधकामाचे गुणवत्ता नियंत्रण, पर्यवेक्षण आणि ते मुदतीत पूर्ण करण्याची जबाबदारी मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद यांची राहील.

११. कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकामाची प्रक्रिया मुदतीत पूर्ण होण्यासाठी तसेच यामध्ये येणाऱ्या अडचणींचे निराकरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, यवतमाळ यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात यावी :-

अ). जिल्हाधिकारी, यवतमाळ.
आ). कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यवतमाळ.
इ). मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद.

१२. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत प्रस्तावित कामाच्या ठिकाणी ठळकपणे निदर्शनास येईल अशा ठिकाणी फलक लावण्यात यावा व त्यावर खालील बाबीचा समावेश करण्यात यावा.

- भारत सरकारचे राजचिन्ह /भारत सरकारच्या मंत्रालय /विभागाचे नाव
- प्रकल्प किंमत / केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण.
- योजनेचे नाव.
- काम सूरू होण्याचा दिनांक.
- अंमलबजावणी यंत्रणा.
- अधिकच्या माहिती व अभिप्रायासाठी अधिकारी/ अंमलबजावणी यंत्रणा यांचे संपर्काचा तपशिल संकेतस्थळासह.

५. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार अभ्यासिका केंद्र बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च **"मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च ) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)"** तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च **"मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च )(२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा,

६. प्रस्तुत शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक **२०२००११३१५१७२४४२१४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

William Manwel Dsouza

Digitally signed by William Manwel Dsouza
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Welfare Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d736942a8f478e484a5c21abe75b8bbf7a0535119974e7126241c3ad35615c8, cn=William Manwel Dsouza
Date: 2020.01.13 15:04:22 +05'30'

**( वि.म.डिसोजा )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त,अमरावती.
४. जिल्हाधिकारी, यवतमाळ.
६. मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
१०.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती
११.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
१३.वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१४.नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१५.निवड नस्ती, (का.७)